**महाराष्ट्र लोकसेवा आयोगातील गट-ड संवर्गातील मंजूर असलेल्या पदांपैकी २५ टक्के पदे निरसित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मलोआ१११६/प्र.क्र.२९०/आठ**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,.**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२**
तारीख: २१ डिसेंबर, २०१६

**वाचा -**

1) **शासन निर्णय क्रमांकः मलोआ-१००५/८८८/प्र.क्र.५८/०५/आठ, दिनांक ५ ऑक्टोबर, २०१६**
2) **शासन निर्णय क्रमांकः मलोआ -१००८/२६६/प्र.क्र.८८/०८/आठ दिनांक १७ ऑगस्ट, २०१०**
3) **शासन निर्णय क्रमांकः मलोआ -१००८/२६६/प्र.क्र.८८/०८/आठ दिनांक २२.०२.२०११**
4) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण२०१५/प्र.क्र.५७/२०१५/विसु-१ दिनांक १४ जानेवारी,२०१६**

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या आस्थापनेवरील २३५ पदांच्या आकृतिबंधास संदर्भाधीन क्र.१ दिनांक ५.१०.२००६ मधील शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली आहे. त्यानंतर संदर्भाधीन क्र.२ दिनांक १७.०८.२०१० नुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयात गट अ व गट ब संवर्गात तसेच तांत्रिक संवर्गात विविध संवर्गाची ४४ पदे व क्र.३ दिनांक २२.२.२०११ नुसार सहसचिवांची २ पदे अशी एकूण २८१ पदे मंजूर करण्यात आलेली आहेत.

२. वित्त विभागाच्या दिनांक १४.१.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १(५) नुसार गट -ड संवर्गातील मंजूर पदांच्या २५ टक्के पदे निरसीत करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या आस्थापनेवर ड -संवर्गाची नाईक-७, शिपाई-२५, हमाल-६ व स्वच्छक-१ अशी एकूण ३९ पदे असून त्यापैकी २५ टक्के पदे म्हणजेच १० पदे निरसित करणे आवश्यक आहे.

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगातील गट-ड संवर्गातील मंजूर ३९ पदांपैकी रिक्त असलेली शिपाई संवर्गातील १० पदे या शासन निर्णयाद्वारे निरसीत करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२११८०३४९१००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2016.12.21 18:07:50 +05'30'

**(सु.ह. उमराणीकर)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई.

२. महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने)
६. उप सचिव (वित्तीय सुधारणा-१/विनियम, व्यय-४) वित्त विभाग मंत्रालय, मुंबई-३२
७. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १९, १९-अ, व २५ मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती कार्यासन-८